**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः असप-१२१७/प्र.क्र.०४/२०१७/चौदा**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: ०७ ऑगस्ट, २०१७

<u>वाचा</u> - सा.प्र.वि. क्रमांक:- बीसीसी-२००१/प्र.क्र.६४/०१/१६-ब, दि.०१.०४.२००८

## शासन आदेश

मा.उच्च न्यायालयात दाखल केलेल्या रिट याचिका क्र.२७९७/२०१५ मधील अंतिम निकालाच्या अधीन राहून तसेच याचिका क्र. २९८२/२०००, २९८६/२००० व ४९५८/२००३ च्या अंतिम निकालाच्या अधीन राहून खालील कक्ष अधिकाऱ्यांना अवर सचिव पदावर तदर्थ पदोन्नती देण्यात येत असून, त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर स्तंभ-४ मध्ये दर्शविण्यात आलेल्या विभागामध्ये करण्यात येत आहे :-

| अ. क्र. | कक्ष अधिका-याचे नांव | सध्याचा विभाग | अवर सचिव पदावर पदोन्नतीने पदस्थापना केलेला विभाग |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री.रा.शा.कौरते (अ.ज.) | नगर विकास विभाग | सार्वजनिक आरोग्य विभाग |
| २ | श्री.अ.प्र.अहिरे (अ.जा.) | नगर विकास विभाग | सार्वजनिक आरोग्य विभाग |
| ३ | श्री.सं.ब.संदानशीव (अ.जा.) | विधी व न्याय विभाग | पर्यावरण विभाग |

२. सदर अधिकाऱ्यांची अवर सचिव पदावरील तदर्थ पदोन्नती त्यांचेविरुध्द कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी प्रलंबित नाही, या धारणेच्या अधीन तसेच खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

(अ) सदर तदर्थ पदोन्नती प्रथम अकरा महिने किंवा सामान्य प्रशासन विभागाकडून निवडसूचीवरील नियमित अवर सचिव नियुक्त होईपर्यंत यापैकी जे अगोदर घडेल त्या कालावधीकरिता असेल.

(ब) प्रतिनियुक्तीवर असलेले ज्येष्ठ अधिकारी यांचे प्रत्यावर्तन झाल्यानंतर त्यांच्यासाठी अवर सचिव संवर्गात रिक्त पद उपलब्ध नसल्यास या आदेशातील कनिष्ठतम अधिकाऱ्याला पदावनत करण्याच्या अधीन सदर तदर्थ पदोन्नत्या देण्यात येत आहेत.

(क) वरील अधिकाऱ्यांची सदर पदोन्नती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून करण्यात आली आहे.

(ड) या तदर्थ पदोन्नतीमुळे संबंधित अधिकाऱ्यांना नियमित पदोन्नतीचे म्हणजेच ज्येष्ठतेचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

३. हे आदेश तात्काळ अंमलात येतील. पदोन्नत झालेल्या अधिका-यांना संबंधित विभागाने तात्काळ कार्यमुक्त करुन या विभागास कळवावे. तसेच पदोन्नत अधिकाऱ्यांनी पदस्थापना केलेल्या विभागात तात्काळ रुजू व्हावे. पदस्थापनेत बदल करण्यासंबंधीच्या विनंतीची दखल घेण्यात येणार नाही.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८०७१८४२५२४७०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration, postalCode=400032, st=Andhra Pradesh, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2017.08.07 18:33:53 +05'30'

(ग.भि.गुरव)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव
३. अ.मु.स. (सेवा), सा.प्र.वि.,
४. अ.मु.स./प्रधान सचिव/सचिव, संबंधित मंत्रालयीन विभाग
५. सह/उप सचिव/(आस्थापना), नगर विकास विभाग, विधी व न्याय विभाग, सार्वजनिक आरोग्य विभाग, पर्यावरण विभाग,
६. श्री. रा.शा.कौरते, कक्ष अधिकारी, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
७. श्री. अ.प्र.अहिरे, कक्ष अधिकारी, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
८. श्री. सं.ब.संदानशीव, कक्ष अधिकारी, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
९. कार्यासन १४-ब
१०.कार्यासन १४, निवड नस्ती.
११.कार्या.१४/पदोन्नती संग्रह.